**गट 'ड' मधील कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक नस्त्या अद्ययावत ठेवणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,

परिपत्रक क्रमांक: सीएफआर-१२०१/७२५/१३,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: २७ फेब्रुवारी, २००३

**वाचा:-** १) शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र. सीएफआर-१२९३/९५३/प्र.क्र.९६/९३/१३, दिनांक २६ जुलै, १९९४.

## परिपत्रक

चतुर्थ श्रेणीतील ('ड' गटातील) शासकीय कर्मचाऱ्यांचे सन १९९४-९५ या वर्षापासून गोपनीय अहवाल लिहिण्याची पध्दत शासन निर्णय क्र. सीएफआर-१२९३/९५३/ प्र.क्र.९६/९३/१३, दिनांक २६ जुलै, १९९४ अन्वये बंद करण्यात आली आहे. त्याऐवजी विभागातील 'ड' गटातील प्रत्येक कर्मचाऱ्यासाठी ठेवण्यात येणाऱ्या वैयक्तिक नस्तीमध्ये संबंधित कर्मचाऱ्याच्या उत्कृष्ट/वाईट अशा दोन्ही प्रकारच्या नोंदी घेण्यात याव्यात अशा सूचना देण्यात आल्या आहेत. तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, दिनांक २६ जुलै, १९९४ च्या आदेशान्वये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन केले जात नाही यास्तव सदर आदेशाचा पुनरुच्चार करुन असे निर्देशित करण्यात येते की, सदर आदेशांचे काटेकोरपणे पालन केले जाईल व त्या अनुषंगाने गट 'ड' मधील कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक नस्त्या अद्ययावत ठेवल्या जातील याची सर्व संबंधितांनी दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( बा. बा. नारायणकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचेसचिव
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई,
संचालक, शासकीय मुद्रण व लेखन सामग्री संचालनालय, मुंबई,
व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई,
येरवडा तुरुंग मुद्रणालय, पुणे शासकीय मुद्रणालय, नागपूर,
मंत्रालयाच्या विविध विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
* पत्राने

—x०x—

एच - ११२८ (४०००-३-०३)